सन २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष २४०१ ०७५३ पीक स्पर्धा (कार्यक्रम) प्रचार व प्रसिध्दीसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८/३-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०२ मार्च, २०२३

वाचा :

१. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.विप्र-४/निधी उपलब्ध/३९७४/२०२३, दि.०२/०२/२०२३

२. विभागाच्या अर्थसंकल्प शाखेचे दि.२८.०२.२०२३ रोजीचे निर्देश.

प्रस्तावना :-

राज्यातील शेतकऱ्यांच्या उत्पन्नात सातत्य रहावे यासाठी कृषि विभागामार्फत विविध योजना राबविण्यात येत आहेत. याचाच एक भाग म्हणून सद्यस्थितीत काही शेतकरी अभिनव उपक्रम/तंत्रज्ञान / शेती पध्दती वापरुन उत्पादन व उत्पन्न वाढ करीत आहेत. अशा शेतकऱ्यांचा आदर्श इतर शेतकऱ्यांपुढे ठेवणे, विद्यापीठांनी सदर तंत्रज्ञान शास्त्रोक्त कसोटीवर तपासून अद्ययावत करणे आणि कृषि विभागाने या अभिनव उपक्रम/तंत्रज्ञान/शेती पध्दती यांचा उपयोग इतर शेतकऱ्यांना होण्याच्या दृष्टीने विस्तार कार्य हाती घेणे व अशा अभिनव उपक्रमशील शेतकऱ्यांच्या माध्यमातून इतरांना प्रेरणा देणे आवश्यक आहे. याकरिता विविध प्रसार माध्यमाचा प्रभावीपणे वापर केला जातो.

शासनाने कृषिसाठी घेतलेले धोरणात्मक निर्णय, शासनाच्या विविध योजनाचे, शासनस्तरावरुन व क्षेत्रीयस्तरावरुन प्राप्त होणारे प्रगती पथावरील कामे, महत्वपूर्ण शासन निर्णय व शासन शेतकरी हिताकरिता राबवित असलेल्या योजना देखील तप्तरतेने व परिणामकारकरित्या शेतक-यापर्यंत जाणे गरजेच आहे. याकरिता छायाचित्रे, लेख, यशोगाथा, पुस्तिक छपाई, पोस्टर, घडिपत्रिका, होर्डिंग, आकाशवाणी व खाजगी रेडीओ वाहिनीद्वारे, जिंगल्स, बसेवर जाहिराती, फेसबुक, ट्विटर, युट्युब, व्हॉट्सअप इ. सोशल मिडीयाच्या माध्यमांबरोबरच वृत्तपत्रांतून प्रचार व प्रसिध्दी करण्यात येते.

सन २०२२-२३ करीता लेखाशिर्ष २४०१ ०७५३ पीक स्पर्धा (कार्यक्रम) अंतर्गत प्रचार व प्रसिध्दीसाठी रु. १.०० कोटी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. तथापि वित्त विभागाने BEAMS वर सदर बाबींसाठी ७०% ची मर्यादा घातली आहे. सबब रु.७०.०० लक्ष एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्याबाबत प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२२-२३ मध्ये पीक स्पर्धा (कार्यक्रम) योजनेंतर्गत "प्रचार व प्रसिद्धी" कार्यक्रम राबवण्यासाठी रु.७०.०० लक्ष (अक्षरी रुपये सत्तर लक्ष फक्त) एवढ्या खर्चास प्रशासकीय वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या वरील खर्च "मागणी क्र.डी-३, २४०१,(०१) (०३) पीक स्पर्धा (कार्यक्रम), २६ जाहीरात व प्रसिध्दी (२४०१ ०७५३) या लेखाशिर्षाखाली, २६ जाहीरात व प्रसिध्दी या बाबीवरील सन २०२२-२३ करीता मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सन २०२२-२३ मध्ये प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबिवण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना कार्यक्रमाचे कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी प्रस्तुत कार्यक्रम राबविण्याबाबतचा अहवाल शासनास सादर करवा.

४. पीक स्पर्धा योजनेंतर्गत सन २०२२-२३ मध्ये प्रचार व प्रसिध्दी मोहिम राबविण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत असलेला रु.७०.०० लक्ष निधी सन २०२२-२३ या चालू वित्तीय वर्षात अखर्चित राहणार नाही. याची अमलंबजावणी यंत्रणांनी दक्षता घ्यावी. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी निधी विनियोगाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०२१४५५१५४५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT
GORAKHNATH
MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.03.02 15:01:03 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत-**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
४. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२ नागपूर

५. सर्व संचालक / कृषि सह संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. सर्व विभागीय कृषि सह संचालक

७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८. कक्ष अधिकारी,कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

९. निवडनस्ती (३ अे).